सिंगल विंडो इंटरफेस अंतर्गत शेतकऱ्यांसाठी उपयुक्त असे एकच मोबाईल ॲप तयार करण्यासाठी जलद कृती गटाची स्थापना करण्याबाबत -

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१५/२-अे,
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :** कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि. ३१ जानेवारी, २०२५ .

**प्रस्तावना :-**

या विभागाच्या दि.३१ जानेवारी, २०२५ रोजीच्या शासन निर्णयानुसार कृषि विभागामार्फत शेतकऱ्यांना सल्ला सेवा देण्याच्या उद्देशाने डिजिटल तंत्रज्ञानावर आधारित "कृषि माहितीसाठी एकच खिडकी" म्हणजेच Single Window Interface - SWI तसेच "शेतकऱ्यांसाठी एकच मोबाईल ॲप" तयार करण्याच्या उद्देशाने प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने यासंदर्भातील अहवाल सादर केला आहे. सदर अहवाल स्वीकृत करण्यात आला आहे.

सदर अहवालातील शिफारशीनुसार राज्यातील मोठ्या संख्येने असलेल्या अल्प व अत्यल्प भूधारक तसेच बहुभूधारक आणि बागायती शेतकऱ्यांना शेतीमधील जोखीम कमी करण्यासाठी विविध प्रकारची अद्ययावत माहिती सहज समजेल अशा स्वरुपात निरंतरपणे उपलब्ध करून देण्याची आवश्यकता आहे. सध्या उपलब्ध झालेल्या डिजिटल तंत्रज्ञानामुळे शेतकऱ्यांना उत्तम शेती करण्यासाठी आवश्यक असलेल्या विविध प्रकारच्या गरजा भागविण्यासाठी "शेतकऱ्यांसाठी एकच मोबाईल ॲप" शक्य तितक्या लवकर विकसित करणे आवश्यक आहे. या ॲप्लिकेशनचा पहिला टप्पा (First Version) १ एप्रिलपर्यंत सुरू करण्याचे आणि मान्यवरांच्या हस्ते उद्घाटन करण्याचे नियोजित आहे. त्यासाठी माहितीचे संकलन, वर्गीकरण, पडताळणी, आयटी विकसन, ॲप्लिकेशन टेस्टिंग इत्यादी कामे युद्धपातळीवर करणे आवश्यक आहे. **सदर कामाची वेळेत पूर्तता करण्यासाठी कृषि आयुक्तालय आणि चारही कृषि विद्यापीठे विकसन टप्पा १ (एप्रिल २०२५ पर्यंत)**

आणि **विकसन टप्पा २ (१ मे ते डिसेंबर २०२५)** मध्ये सहभागी असतील. या संदर्भात, कृषि विभाग आणि कृषि विद्यापीठाच्या समन्वयाने जलद कृती गट तयार करण्याची आवश्यकता असल्याने, खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील मोठ्या संख्येने असलेल्या अल्प व अत्यल्प भूधारक तसेच बहुभूधारक आणि बागायती शेतकऱ्यांना शेतीमधील जोखीम कमी करण्यासाठी विविध प्रकारची अद्ययावत माहिती सहज समजेल अशा स्वरुपात निरंतरपणे उपलब्ध करून देण्यासाठी आणि सध्या उपलब्ध झालेल्या डिजिटल तंत्रज्ञानामुळे शेतकऱ्यांना उत्तम शेती करण्यासाठी आवश्यक असलेल्या विविध प्रकारच्या गरजा भागविण्यासाठी "शेतकऱ्यांसाठी एकच मोबाईल ॲप" तयार करण्याकरीता खालीलप्रमाणे विविध जलद कृती गटांची स्थापना करण्यात येत आहे.

**१) कृषि विभाग आणि कृषि विद्यापीठातील समन्वयक तथा संपर्क अधिकारी यांचा कृती गट**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | कार्यालय |
|---|---|---|
| १. | कृषि सहसंचालक (विस्तार २) | आयुक्त कृषि, पुणे |
| २. | अतिरिक्त प्रकल्प संचालक | बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (स्मार्ट) प्रकल्प , पुणे |
| ३. | कृषि विद्यावेत्ता | नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प , मुंबई |
| ४. | संचालक, विस्तार व शिक्षण | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी जि. अहिल्यानगर |
| ५. | संचालक, विस्तार व शिक्षण | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी |
| ६. | संचालक, विस्तार व शिक्षण | डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला |
| ७. | संचालक, विस्तार व शिक्षण | डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ , दापोली जि. रत्नागिरी |

**कृती गटाच्या जबाबदाऱ्या**

१. संबधित विभाग/ विद्यापीठातील माहितीचे संकलन करणे
२. विभागांतर्गत आणि विद्यापीठांतर्गत विकसित केलेल्या आणि विकसन प्रक्रियेत असलेल्या विविध IT platform आणि मोबाईल ॲप्लिकेशनसाठी तयार केलेल्या

मास्टर डेटा फाइल्स नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकडे API किंवा इतर माध्यमाद्वारे पाठविणे (share करणे).

३. शेतकऱ्यांना अचूक माहिती मिळावी यासाठी नव्याने विकसित केले जाणारे मोबाईल App आणि केंद्र शासनाचे VISTAAR नेटवर्क हे दोन्ही त्रुटीरहित आणि प्रमाणित कार्यप्रणालीवर (Standard Operating Procedures - SOPs) आधारित असणे अत्यावश्यक आहे. त्यामुळे शेतकरी मोबाईल ॲपवर उपलब्ध केली जाणारी माहिती अचूक असावी याची दक्षता घेणे.

४. कृषि विभाग, कृषि विद्यापीठे, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प व बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (स्मार्ट) प्रकल्प, ह्या सर्व यंत्रणांनी विकसित केलेले ॲप्स आणि पोर्टल्स चालू स्थितीत असावेत आणि त्यांचे API SWI सोबत एकत्रित (integrate) केलेले आहेत हे सुनिश्चित करणे.

५. इतर कृती गटांशी समन्वय ठेवून त्यांना दिलेल्या जबाबदाऱ्या जलद गतीने पार पाडण्यासाठी आवश्यक तो पाठपुरावा तसेच सहकार्य करणे.

६. VISTAAR किंवा इतर AI/ML द्वारे तयार केलेल्या AI/ML प्रतिसादांचे (responses) फेर तपासणी करणे आणि त्रुटी कमी करण्यासाठी अभिप्राय (feedback) तसेच सुधारणा सुचविणे

७. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करणे

## २) कृषि विद्यापीठांबरोबर समन्वय करण्यासाठी कृती गट

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम | समन्वय विद्यापीठ |
|---|---|---|---|
| १. | डॉ. तुकाराम मोटे | विभागीय कृषि सह संचालक, छत्रपती संभाजीनगर | सर्वसाधारण समन्वय |
| २. | श्री.विजय राऊत | अधीक्षक कृषि अधिकारी, वि.कृ .स., पुणे | महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे |
| ३. | श्री.प्रवीण गोसावी | उपविभागीय कृषि अधिकारी, श्रीरामपूर जि. अहिल्यानगर | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी |
| ४. | श्री.दौलत चौहान | प्रकल्प संचालक (आत्मा), परभणी | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | डॉ मुरलीधर इंगळे | प्रकल्प संचालक (आत्मा), अकोला | डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला |
| ६. | श्री.शिवकुमार सदाफुले | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, रत्नागिरी | डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली |

**कृती गटाच्या जबाबदाऱ्या**

१. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद तसेच नेमून दिलेले विद्यापीठ यांच्याशी प्रभावी समन्वय ठेवून विद्यापीठांनी शेतकऱ्यांसाठी तयार केलेल्या तांत्रिक माहितीचे जसे की प्रकाशित केलेल्या शेतकरी दैनंदिनी, संयुक्त संशोधन समितीच्या शिफारशी, विविध पिकांच्या शेतकरी माहिती पुस्तिका इ साहित्याचे soft copy मध्ये संकलन करणे.
२. कृषि विद्यापीठाच्या शिफारशी जशा अद्ययावत होतील तशा, प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांचेकडे त्या शिफारशी पाठविणे.
३. संकलीत साहित्य पुढील वर्गीकरणासाठी "तांत्रिक साहित्य पडताळणी आणि वर्गीकरण" कृती गटाकडे पाठविणे.
४. कृषि विभागासाठी नेमलेल्या संपर्क अधिकाऱ्यांशी समन्वय ठेवून कामाच्या प्रगतीबाबत अवगत करणे.
५. VISTAAR किंवा इतर AI/ML द्वारे तयार केलेल्या AI/ML प्रतिसादांचे (responses) फेर तपासणी करणे आणि त्रुटी कमी करण्यासाठी अभिप्राय (feedback) तसेच सुधारणा सुचविणे.
६. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करणे

**३) तांत्रिक साहित्य पडताळणी आणि वर्गीकरण कृती गट**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | कार्यालय |
|---|---|---|
| १. | श्री.रविशंकर चलवदे , कृषि सहसंचालक (नियोजन) | कृषि आयुक्तालय , पुणे |
| २. | श्रीमती अरुणा लांडे, उपसंचालक, माहिती | कृषि आयुक्तालय , पुणे |

| | | |
|---|---|---|
| ३. | श्रीमती पुनम खटावकर, संपादक, शेतकरी मासिक | कृषि आयुक्तालय , पुणे |
| ४. | डॉ. प्रेमसिंग मारग, उपसंचालक | प्रकल्प संचालक (आत्मा), अकोला |
| ५. | श्रीमती वैशाली आठरे, तंत्र अधिकारी, मृद व जलसंधारण | कृषि आयुक्तालय , पुणे |
| ६. | श्री.राजेश चव्हाण, तंत्र अधिकारी, फलोत्पादन | कृषि आयुक्तालय , पुणे |
| ७. | श्री.राहुल सोलनकर, तंत्र अधिकारी | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, सातारा |
| ८. | श्री.नित्यानंद भोसले , तंत्र अधिकारी | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, रत्नागिरी |
| ९. | श्रीमती पूजा थिटे, तंत्र अधिकारी | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, परभणी |

**कृती गटाच्या जबाबदाऱ्या**

१. कृषि विद्यापीठ समन्वय कृती गटाने पाठविलेले तांत्रिक साहित्य जसे की कृषि विद्यापीठांनी प्रकाशित केलेल्या शेतकरी दैनंदिनी, संयुक्त संशोधन समितीच्या शिफारशी, कृषि विभागाने तसेच विद्यापीठांनी प्रसिद्ध केलेल्या विविध पिकांच्या शेतकरी माहिती पुस्तिका इ. साहित्याची छाननी करून आणि व्यवस्थित वर्गीकृत करणे.

२. कृषि विद्यापीठ/ कृषि संशोधन संस्था यांचेकडील डिजिटल लायब्ररी/स्रोत साहित्य/संदर्भ साहित्य/ॲप्स आणि पोर्टल्सचे वर्गीकरण करणे.

३. वेळेची मर्यादा लक्षात घेता, कृती गटातील सदस्यांनी प्राप्त साहित्य विभागून घेवून त्याच्या पडताळणीचे काम त्वरित सुरू करावे आणि १२ मार्चपर्यंत ते अचूक, प्रमाणित (validated) आणि अद्ययावत (up-to-date) असल्याची खात्री करून, प्रमाणपत्र (certificate) सोबत प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांच्याकडे सादर करावे.

४. VISTAAR किंवा इतर AI/ML द्वारे तयार केलेल्या AI/ML प्रतिसादांचे (responses) फेर तपासणी करणे आणि त्रुटी कमी करण्यासाठी अभिप्राय (feedback) तसेच सुधारणा सुचविणे.

५. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करणे.

२. वरील कृती गटातील सर्व सदस्यांनी, त्यांना दिलेल्या जबाबदाऱ्या ह्या, त्यांची नियमित कर्तव्ये सांभाळून पार पाडावयाची आहेत.

३. कामाचे गांभीर्य विचारात घेऊन, सदर कृती गटांना नेमून देण्यात आलेल्या जबाबदाऱ्यांचे पालन सर्व सदस्यांनी काटेकोरपणे व विहित वेळेत पार पाडावे. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प यांनी सर्व कृती गटांनी केलेल्या कामांचा साप्ताहिक तसेच आवश्यकतेनुसार वेळोवेळी आढावा घ्यावा. तसेच, प्रधान सचिव (कृषि) यांना कामातील प्रगतीची माहिती द्यावी.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचे सांकेतांक २०२५०२२८१७५२०४३७०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2025.02.28 19:04:37 +05'30'

(संतोष कराड)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास व गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१०.मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

११.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३.सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.

१४.प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.

१५.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.

१६.प्रकल्प संचालक, बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र राज्य कृषि व्यवसाय आणि ग्रामीण परिवर्तन प्रकल्प, पुणे.

१७.महासंचालक , महाराष्ट्र कृषी शिक्षण आणि संशोधन परिषद , पुणे

१८. कुलगुरू, महात्मा फुले कृषी विद्यापीठ/ वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ/ डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला/ डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली

१९.कृती गटातील सर्व सदस्य, (सहसंचालक (प्रशासन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचेमार्फत)

प्रत माहितीसाठी,

१. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागातील सर्व उप सचिव यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. निवडनस्ती (२-अे)